**सन २०११-२०१२ केंद्र शासनाची साठी आम आदमी विमा योजना राज्यात राबविण्यासाठी लागणाऱ्या प्रशासकीय खर्चासाठी निधीचे वितरण.**

**महाराष्ट्र शासन**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक : आआवि-२०११/प्र.क्र.१९३/विसयो-१
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :२३ सप्टेंबर,२०११.

**वाचा** :- १) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र.आआवि-२०१०/प्र.क्र.२२६/विसयो-२, दि.०८ जून,२०११.

**प्रस्तावना :** केंद्र पुरस्कृत आम आदमी विमा योजना राज्यात रबविण्यात येत आहे. संदर्भाधिन शासन निर्णय अन्वये आम आदमी विमा याजनेसाठी भूमिहीन कुटुंबाची व्याख्या निश्चित करण्यात आली असून त्यानुसार जी व्यक्ती ५ एकरपेक्षा कमी जिरायती व २.५ एकरपेक्षा कमी बागायती शेत जमीन धारण करीत असेल त्या व्यक्तीला भूमिहीन म्हणून गृहित धरण्यात येणार आहे. या व्याख्येमुळे जिल्हा पातळीवर लाभार्थी नोंदणीसाठी धडक कार्यक्रम हाती घेण्यात आले आहेत. त्यामुळे लाभार्थी संख्येत प्रंचड वाढ होणार आहे. तसेच, योजनेच्या कार्यभारात निश्चितच वाढ झालेली आहे. या योजनेंतर्गत प्रशासकीय खर्चासाठी सन २०११-१२ करिता रु.२,००,००,०००/- (रु. दोन कोटी फक्त) इतका निधी मंजूर करण्यात आला आहे. ही योजना राबविण्यासाठी सर्व जिल्हयाना प्रशासकीय खर्चासाठी काही निधी वितरीत करण्याची बाब शासनाचे विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-** केंद्र शासनाच्या आम आदमी विमा योजनेच्या प्रशासकीय खर्चासाठी सन २०११-१२ करिता जिल्हाधिकारी ( मुंबई व मुंबई उपनगर वगळून) यांना प्रत्येकी रु.१,००,०००/- (रु. एक लक्ष फक्त) या प्रमाणे एकूण रु.३३,००,०००/- (रु. तेहतीस लक्ष फक्त) इतका निधी याद्वारे वितरीत करण्यात येत आहे.

२. यासाठी होणारा खर्च मागणी क्र.एन-३, २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०-इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, १०४- ठेव संलग्न विमा योजना शासकीय भविष्य निर्वाह निधी, (००)(०१) आम आदमी विमा योजना (योजनेतर) (२२३५ ३३८२), ५०-इतर खर्च या लेखाशिर्षामधून सन २०११-१२ या वर्षाच्या मंजूर तरतूदीमधून करण्यात यावा. सदर खर्च केवळ निम्नलिखित बाबींसाठीच करण्याची शासन परवानगी देत आहे. याव्यतिरिक्त इतर कुठल्याही बाबींसाठी खर्च करण्याची अनुमती नाही.

अ) अर्जाची छपाई

ब) प्रशिक्षण/ अभ्यास दैरा.

क) प्रवास खर्च

ड) डेटा एन्ट्री

ई) कार्यालयीन खर्च

३.  या योजनेंतग नविन लाभार्थ्यांच्या नोंदणीसाठी आऊट सोसिंगद्वारे डेटा एन्ट्री करुन भारतीय आयुर्विमा महामंडळाला डेटा त्वरीत देण्यासाठी निधीचा प्रामुख्याने विनियोग करण्यात यावा. याबाबतच्या रक्कमा सर्व जिल्हाधिकाऱ्यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत असून, त्यांनी याबाबतच्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करावे. तसेच याप्रकरणी वेळोवेळी खर्चाच्या रक्कमांचा मेळ घाळण्याचीही दक्षता घेण्यात यावी.

४.  हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२२९/व्यय-१४, दि.६ ऑगस्ट, २०११ च्या अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक क्रमांक - २०११०९२३१५१३०२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( ग. कि. वाघ )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति
सर्व विभागीय आयुक्त, पुणे/कोकण/नाशिक/नागपूर/अमरावती व औरंगाबाद
सर्व जिल्हाधिकारी
संचालक ,लेखा व कोषागारे, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, महाराष्ट्र राज्य ,मुंबई
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई (२ प्रती)
सर्वजिल्हा कोषागार अधिकारी
महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखा परिक्षा / लेखा अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
वित्त विभाग, अर्थसंकल्प -७ अर्थोपाय व व्यय १४, मंत्रालय, मुंबई
अवर सचिव (अर्थसंकल्प) सा.न्या.सां.का.वि.स. विभाग,मंत्रालय, मुंबई.
कक्ष अधिकारी (विसयो-२)सा.न्या.सां.का.वि.स. विभाग,मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती, विसयो-१